**एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-७ च्या प्रयोजनासाठी परिवीक्षाधीन पोलीस उप अधीक्षक/ सहायक पोलीस आयुक्त (नि:शस्त्र) संवर्गाची अधिसंख्य पदे निर्माण करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : रापोसे -१५२१/प्र.क्र.२४५ / पोल-१अ**

दुसरा मजला, मंत्रालय,

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई- ४०० ००१.

दिनांक : ३० मार्च, २०२२.

<u>वाचा :-</u>

१) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.०७/१६/वित्तीय सुधारणा-१, दिनांक २०.०२.२०१६.

२) कार्यालयीन आदेश, सामान्य प्रशासन विभाग, क्र.टिआरएन-१०२१/प्र.क्र.२९/सीपीटीपी-अ, दिनांक २४.१२.२०२१.

३) कार्यालयीन आदेश, सामान्य प्रशासन विभाग, क्र.टिआरएन-१०२१/प्र.क्र.२९/सीपीटीपी-अ, दिनांक १३.०१.२०२२.

४) शासन निर्णय,गृह विभाग क्र.रापोसे-१५२१/प्र. क्र.२४५/पोल-१अ, दिनांक १४.०१.२०२२.

५ शासन पत्र, सामान्य प्रशासन विभाग, क्र.टिआरएन-१०२१/प्र.क्र.२९/सीपीटीपी-अ, दिनांक २९.१२.२०२१.

६) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य यांच्या कार्यालयाचे पत्र क्र. पोमसं/२/सीपीटीपी-७/२०२/२०२१, दिनांक ०८.०२.२०२२ व दिनांक १८.०२.२०२२.

**<u>प्रस्तावना</u>**

शासन आदेश, गृह विभाग, क्र.रापोसे-१५२१/प्र. क्र.२४५/ पोल-१अ, दिनांक १४.०१.२०२२ द्वारे एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-७ (सीपीटीपी-७) अंतर्गत परिवीक्षाधीन पोलीस अधीक्षक/ सहा. पोलीस आयुक्त (नि:शस्त्र) यांच्या प्रशिक्षणाचे नियोजन करण्यात आले आहे. तसेच उक्त आदेशाद्वारे खातेनिहाय संलग्नतेसाठी त्यांना जिल्हा वाटप करण्यात आले आहे. एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-७ अंतर्गत प्रशिक्षणाकरिता एकूण ३० पैकी २९ परिवीक्षाधीन पोलीस उप अधीक्षक/सहायक पोलीस आयुक्त (नि:शस्त्र) रुजू झाले आहेत, असे पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, यांच्या कार्यालयाने दिनांक १८.०२.२०२२ रोजीच्या पत्राद्वारे कळविले आहे.

२. एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-७ या तुकडीमध्ये प्रशिक्षणासाठी रुजू झालेल्या उमेदवारांसाठी पोलीस उप अधीक्षक/सहायक पोलीस आयुक्त (नि:शस्त्र) संवर्गाची अधिसंख्य पदे निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्या अनुसार शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय**

एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-७ (सीपीटीपी-७) या अंतर्गत प्रशिक्षणास रुजू झालेल्या एकूण २९ परिवीक्षाधीन पोलीस उप अधीक्षक/ सहायक पोलीस आयुक्त (नि:शस्त्र) यांचेकरिता, दि. १७ जानेवारी २०२२ पासून पुढील दोन वर्षाच्या कालावधीसाठी वेतनस्तर S- २०, रु. ५६०००/- ते रु.१,७७,५००/- (सहाव्या वेतन आयोगानुसार, रु.१५६००-३९१०० + ग्रेड पे रु.५४००/-) या वेतनश्रेणीत "पोलीस उप अधीक्षक/सहायक पोलीस आयुक्त (नि:शस्त्र)" या संवर्गाची एकूण २९ अधिसंख्य पदे पुढील तक्त्यातील स्तंभ (२) मध्ये नमूद जिल्ह्यांच्या जिल्हा पोलीस अधीक्षक यांच्या आस्थापनांवर, स्तंभ (३) मध्ये निर्दिष्ट केल्याप्रमाणे, निर्माण करण्यास, याद्वारे, मान्यता देण्यात आहे :-

| अ.क्र. | जिल्हा | अधिसंख्य पदांची संख्या |
|---|---|---|
| (१) | (२) | (३) |
| १ | सांगली | २ |
| २ | जालना | १ |
| ३ | अहमदनगर | २ |
| ४ | जळगाव | २ |
| ५ | नाशिक | २ |
| ६ | कोल्हापूर | १ |
| ७ | अकोला | १ |
| ८ | नागपूर | १ |
| ९ | चंद्रपूर | २ |
| १० | सातारा | १ |
| ११ | वाशिम | १ |
| १२ | सोलापूर | १ |
| १३ | नांदेड | २ |
| १४ | बीड | १ |
| १५ | यवतमाळ | २ |
| १६ | लातूर | १ |
| १७ | उस्मानाबाद | १ |
| १८ | रत्नागिरी | १ |
| १९ | बुलढाणा | १ |
| २० | परभणी | १ |
| २१ | पुणे | १ |
| २२ | औरंगाबाद | १ |
| एकूण | | २९ |

२. उक्त अधिसंख्य पदांच्या निर्मितीमुळे होणारा खर्च “गृह विभाग, मागणी क्र. बी-१, २०५५, पोलीस ०० १०९, जिल्हा पोलीस दल, (००) (०१), जिल्हा पोलीस बल (२०५५०१६८) (दत्तमत) (अनिवार्य), ०१-वेतन” या लेखाशीर्षाखाली उपलब्ध मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय, शा.नि., वित्त विभाग क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.०७/१६/वित्तीय सुधारणा-१, दिनांक २० फेब्रुवारी, २०१६, अन्वये प्रशासकीय विभाग या नात्याने गृह विभागास प्राप्त अधिकारांचा वापर करुन, सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३३०२१४९२५१८२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SWAPNIL GOPAL BORSE

Digitally signed by SWAPNIL GOPAL BORSE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c6a6e7cad855fc787a96e36f11fbc87a9f66cfd9bad01184493f2735ad885627, pseudonym=E15DEDF011CBE07295FC54DEC7494CDD2EBE3FA9, serialNumber=8538CD1E408948F7D025537D5F6589BD8958D1B95322E66D2CC5EDF89AD0D79E, cn=SWAPNIL GOPAL BORSE
Date: 2022.03.30 21:51:44 +05'30'

**(स्वप्निल गोपाल बोरसे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.
२. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.
३. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४. अपर पोलीस महासंचालक (प्रशिक्षण व खास पथके), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. अपर पोलीस महासंचालक (आस्थापना), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६. महासंचालक, यशदा, राजभवन आवार, बाणेर रोड, पुणे.
७. संचालक, महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक.
८. संबंधित पोलीस अधीक्षक.
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१०. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
११. जिल्हा कोषागार अधिकारी, सांगली/ जालना/अहमदनगर/जळगाव/ नाशिक/ कोल्हापूर/ अकोला /नागपूर /चंद्रपूर/सातारा/ वाशिम/ सोलापूर/ नांदेड/बीड /यवतमाळ /लातूर/ उस्मानाबाद/ रत्नागिरी / बुलढाणा/परभणी/पुणे/औरंगाबाद.
१२. अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग (सीपीटीपी-अ), मंत्रालय, मुंबई.
१३. वित्त विभाग (कार्यासन व्यय-७ व वित्तीय सुधारणा-१), मंत्रालय, मुंबई.
१४. निवड फाईल, पोल-१अ.